शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेख्यांबाबत महालेखापाल कार्यालयाकडून पुरविण्यात येणारी विवरणपत्रे ऑनलाईन पध्दतीने काढून घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
**शासन निर्णय, क्रमांकः भनिनि-२०१९/प्र.क्र.६१ /का.२४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ सप्टेंबर , २०२०

वाचा :- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. भनिनि-२०१९/प्र.क्र.३१/ का.२४, दि.११ जून २०२०

शासन निर्णय :-

महालेखापाल कार्यालयाकडून सर्व अधिकारी/कर्मचारी यांना SMS व्दारे दरमहा भविष्य निर्वाह निधीची शिल्लक रक्कम मोबाईलवर कळविण्यात येते. त्यामुळे महाराष्ट्र शासनाच्या अ, ब व क गटातील अधिकारी व कर्मचारी यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेखे महालेखापाल कार्यालय, मुंबई व नागपूर कार्यालयाकडून प्रिंट काढून पुरविण्याची पध्दत **सन २०१९-२० या वित्तीय वर्षापासून बंद करण्यास तसेच** महालेखापाल कार्यालयाच्या वेबसाईटवरुन संकेतस्थळ (agmaha.cag.gov.in ) सर्व अधिकारी/कर्मचारी यांना आपल्या भविष्य निर्वाह निधीच्या तपशीलाचे लेखे प्रिंट काढून घेण्याबाबत संदर्भाधीन दिनांक ११ जून २०२० च्या शासन निर्णयाव्दारे कळविण्यात आले आहे.

**तथापि,**महालेखापाल कार्यालय, मुंबई व संचालक लेखा व कोषागारे,संचालनालय,मुंबई यांच्या दरम्यान बैठक होऊन भविष्य निर्वाह निधीचे लेखे महालेखापाल मुंबई यांच्या संकेतस्थळावर (agmaha.cag.gov.in ) अपलोड करुन जतन करण्याऐवजी **सेवार्थ प्रणालीवर** ( SEVAARTH SERVER ) **अपलोड करुन** सदर संकेतस्थळावरुन अधिकारी/कर्मचारी यांनी सन २०१९-२० या वित्तीय वर्षापासून प्रिंट काढून घेण्यास सहमती झाल्याचे संचालक (लेखा व कोषागारे) मुंबई यांनी दिनांक २१.०७. २०२० च्या पत्रान्वये महालेखापाल,मुंबई कार्यालयास कळविले आहे. त्यानुसार **सेवार्थ प्रणालीवर** (SEVAARTH SERVER ) **भविष्य निर्वाह निधीच्या स्लीप सन २०१९-२० या वित्तीय वर्षापासून अपलोड करण्यास शासन मंजूरी देत आहे. सर्व अधिकारी/कर्मचारी यांनी सेवार्थ प्रणालीवरुन भविष्य निर्वाह निधीचे लेखाची विवरणपत्र काढुन घ्यावीत. संदर्भाधीन दिनांक ११.०६.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील उर्वरीत बाबी यथास्थिती लागू राहतील.**

२. संचालक लेखा व कोषागारे यांनी कळविल्यानुसार सन २०१९-२० वित्तीय वर्षाच्या भविष्य निर्वाह निधीची विवरणपत्रे पुढील वित्तीय वर्षाची विवरणपत्र उपलब्ध होइपर्यंत सेवार्थ प्रणालीवर रहातील, त्यानंतर सदर विवरणपत्रे महालेखापाल मुंबई यांच्या संकेतस्थळावर उपलब्ध असतील. यापध्दतीने पुढील वित्तीय वर्षामध्ये कार्यवाही सुरु राहील.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अ.नौ.सं.क्र.१६/२०२०, दिनांक १४.०९.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२४१३०२५८५३०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.09.24 13:05:50 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
७) अपर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई /नागपूर
९) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
१०) उप सचिव ( का.१३ अ) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
११) सर्व मंत्रालयीन विभाग ( त्यांना विनंती करण्यात येते की,त्यांनी सदर शासन निर्णय मंत्रालयातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या तसेच त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावा.)
१२) सर्व विभागीय आयुक्त
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी ( जिल्हा परिषद)
१५) संचालक,नगर पालिका प्रशासन,वरळी,मुंबई
१६) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
१७) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२०) अवर सचिव (रोखशाखा ) मंत्रालय,मुंबई

२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

२२) निवड नस्ती (कार्यासन २४),सा.प्र.वि.मंत्रालय,मुंबई